**महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळावर नामनिर्देशनाने सदस्याची नियुक्ती करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक कृबास-०१२४/प्र.क्र.१४३/२१स,**
मादाम कामा मार्ग , हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०००३२.
दिनांक-१९ जुलै, २०२४.

**वाचा-** १. महाराष्ट्र कृषी उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम,१९६३.
२.सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.कृपमं-०९२२/प्र.क्र.४९१/२१-स, दि.१७.०५.२०२३.
३. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.कृबास-०१२४/प्र.क्र.१४३/२१-स, दि.१५.०७.२०२४.
४.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांचे पत्र क्र.कृपमं/प्रशासन/ संचालक नियुक्ती/१४३२/२०२४ दि.१८.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ च्या कलम ३९(ब) मध्ये महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळावर सदस्य म्हणून राज्यातील बाजार समित्यांच्या सभापती मधून प्रत्येक महसूल विभागातून एक सदस्य या प्रमाणे ६ सदस्यांची नामनिर्देशनाने नियुक्ती करण्याची तरतूद आहे.

महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळावर नागपूर महसूली विभागातून श्री.चरणसिंग ठाकूर यांची नामनिर्देशित सदस्य म्हणून संदर्भाधीन दि.१७.०५.२०२३ च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे. तर छत्रपती संभाजीनगर महसूली विभागातून श्री.केशवराव तायडे यांची नामनिर्देशित सदस्य म्हणून संदर्भाधीन दि.१५.०७.२०२४ च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे

आता, अमरावती महसूली विभागातून कृषी उत्पन्न बाजार समिती, मलकापूर, जि.बुलढाणा या बाजार समितीचे सभापती श्री.शिवचंद्र तेजराव तायडे यांची महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळावर नामनिर्देशनाने सदस्य म्हणून नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ च्या कलम ३९(ब) नुसार महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळावर सदस्य म्हणून अमरावती महसूली विभागातून कृषी उत्पन्न बाजार समिती, मलकापूर, जि.बुलढाणा या बाजार समितीचे सभापती श्री.शिवचंद्र तेजराव तायडे यांची नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री.शिवचंद्र तेजराव तायडे हे या शासन निर्णयाच्या दिनांकापासून महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळावर सदस्य म्हणून कामकाज पाहण्यास पात्र असतील.

३.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७१९१२२०१७८४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAVI
SANDEEP SHINDE

Digitally signed by MADHAVI SANDEEP SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=020531e249e88fe74bf6db805f42944e7f29bc0ba6134c83c1f183b8cc27f2ff, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB1CBBD6A4EE442FDAA6C1B358BF61FEAF9AEFC16E8F39E9EE1D06B9E8A7A59, cn=MADHAVI SANDEEP SHINDE
Date: 2024.07.19 12:32:35 +05'30'

**(माधवी शिंदे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (पणन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे.
४. श्री.शिवचंद्र तेजराव तायडे, सभापती, कृषी उत्पन्न बाजार समिती, मलकापूर, जि.बुलढाणा.
५. निवडनस्ती (२१-स).